0.PDF

**अखर्चित निधी खर्च करण्याबाबतची कार्यप्रणाली**

**महाराष्ट्र शासन,**
**वित्त विभाग,**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण १०.०२/प्र.क्र.१२८/अर्थोपाय,**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक : १० ऑक्टोबर, २००२.**

**प्रस्तावना :-**

प्रचलित वित्तीय नियमानुसार राज्याच्या तिजोरीतून काढला जाणारा किंवा अर्थसंकल्पीत निधी ३१ मार्च पर्यंत खर्च करणे बंधनकारक आहे. सदरहू मान्य निधी तिजोरीबाहेर काढून ठेवला असल्यास, तो त्या कालावधीपर्यंत खर्च होत नसल्यास तो राज्याच्या तिजोरीत जमा करणे आवश्यक आहे. तसेच अर्थसंकल्पीत निधी खर्च झाला नाही तर ती तरतूद व्यपगत होते.

२. उपरोक्त नियमातील तरतूदी विचारात घेता राज्याच्या तिजोरीतून निधी काढून ठेवणे व तो अखर्चित निधी पुढील वर्षी खर्च करण्यास अनुमती घेणे नियमाला धरुन होत नाही. तरीसुध्दा यापूर्वी एक विशेष बाब म्हणून बाबनिहाय गुणात्मक तपासणी करुन अखर्चित निधी पुढील वर्षात खर्च करण्यास अनुमती देण्यात येत होती. तथापि आता राज्याच्या तिजोरीतून निधी काढून घेऊन आपल्या खात्यात ठेवण्याची प्रवृत्ती बळावत आहे. असा काढून ठेवलेला निधी अखर्चित म्हणून जाहीर करुन तो पुढील वर्षी खर्च करण्यास अनुमती मागण्याच्या प्रस्तावांची संख्या वाढलेली आहे.

३. या प्रवृत्तीला व अशा अनियमिततेला आळा घालण्याचा विचार शासनाच्या विचाराधीन होता. शासनाने त्याबाबत आता निर्णय घेऊन असा अखर्चित निधी राहिल्यास तो नियमित कसा करणार याची कार्यपध्दती ठरविण्यात आलेली आहे.

**शासन निर्णय :-**

आर्थिक वर्षाच्या १५ मार्च नंतर मुक्त करण्यात आलेला, परंतु जिल्हा परिषदांकडील अखर्चित निधी पुढील कार्यपद्धतीने नियमित करण्यात येईल.

(अ) जेवढा निधी शासनाच्या तिजोरीबाहेर आहे तेवढयाच निधीची तरतूद पावसाळी अधिवेशनामध्ये पुरवणी मागणीन्वये करण्यात यावी. योजनांतर्गत खर्चाची बाब असल्यास तेवढा निधी अतिरिक्त निधी म्हणून समजण्यात येईल.

C:\Sankirna/CR-128-02

(ब) अखर्चित निधी राज्याच्या तिजोरीत जमा करण्याची कार्यवाही करण्याऐवजी पुरवणी मागणी मान्य झाल्यानंतर त्या पुरवणी मागणीची रक्कम अखर्चित निधीशी समायोजित करण्याचे आदेश काढण्यात यावेत. म्हणजेच हा निधी त्या वर्षी खर्च करण्यास उपलब्ध होईल.

(क) पुरवणी मागणी मान्य झाल्यानंतर, निधी खर्च करण्याचे आदेश संबंधित विभागाने परस्पर काढावेत.

दि.१५ मार्च पूर्वी मुक्त झालेली परंतु दि.३१ मार्च पर्यंत खर्च होण्याची शक्यता नसलेली किंवा दि.३१ मार्च रोजी अखर्चित असलेली रक्कम मात्र शासनाच्या तिजोरीत जमा करण्यात यावी. अशा स्वरुपाची अखर्चित रक्कम कोणत्याही परिस्थितीत उपरोक्त पध्दतीने नियमित करण्यास अनुमती मिळणार नाही याची दक्षता घ्यावी.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**(सु.सा.गायकवाड)**
**शासनाचे सह सचिव, वित्त विभाग.**

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव (सर्व मंत्रालयीन विभाग)
२. महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
३. महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखा व परीक्षा), मुंबई
४. महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
५. महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखा व परीक्षा), नागपूर
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/वांद्रे
७. निवासी लेखा अधिकारी, मुंबई
८. निवड नस्ती, अर्थोपाय.